**नाबार्ड अर्थसहाय्यित राज्यातील २८ गावांसाठी सांडपाणी व्यवस्थापनासाठी ग्रामीण पायाभूत विकास निधी-१९ (RIDF-XIX) अंतर्गत सन २०१६-१७ साठी निधी वितरीत करणेबाबत...**
**(लेखाशीर्ष २२१५ ९८७१)**

## महाराष्ट्र शासन

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः नाबार्ड-१५१६/प्र.क्र.६९/पापु-१६
७ वा मजला, जी.टी. रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक रोड, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: ३० मार्च, २०१७

**वाचा**

१. **महाव्यवस्थापक, नाबार्ड यांचे मंजूरी पत्र क्रमांक :** NB/SPD/३०२७२/१०५/RIDF-XIX (Maharashtra)/१४१ PSC/२०१३-१४, दि. ४ मार्च, २०१४.
२. **पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,शासन निर्णय क्रमांक :** नाबार्ड-२०१४/प्र.क्र.०४/पापु-०८, दि.१४ ऑगस्ट, २०१४.
३. **वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांक:** नाबार्ड-२०१३/प्र.क्र.५६/अर्थबळ, दि.२९डिसेंबर,२०१५.
४. **वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांक :** अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/पापु-१६, दि.२० एप्रिल,२०१६.

**प्रस्तावना**

राज्याच्या ग्रामीण भागातील सांडपाणी व्यवस्थापनाकरिता, नाबार्ड, ग्रामीण पायाभूत विकास निधी-१९ (RIDF-XIX) कर्ज अंतर्गत राज्यातील ग्रामीण भागातील १५,००० व त्यापेक्षा अधिक लोकसंख्या असलेल्या २८ गावांतील सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्प राबविण्यासाठी रु.११२५८.३८ लक्ष रक्कमेच्या प्रकल्पास वाचा मधील क्र.२ येथील पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.तसेच वाचा मधील क्र.३ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये सदर प्रकल्प पूर्ण करण्याकरीता नाबार्डने मंजूर केलेल्या योजनेसाठी रू.९७३५.०१ लक्ष रकमेचे कर्ज स्विकारार्ह ठरविले आहे. राज्याच्या ग्रामीण भागातील सांडपाणी व्यवस्थापनाकरिता, नाबार्ड, ग्रामीण पायाभूत विकास निधी-१९ (RIDF-XIX) कर्ज अंतर्गत सन २०१६-१७ साठी लेखाशीर्ष २२१५ ९८७१ खाली रु.३५००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला होता तथापि वित्त विभागाने सुधारीत अंदाजानुसार रु.२८००.०० लक्ष इतका निधी वितरणासाठी उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता, याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

## शासन निर्णय

ग्रामीण पायाभूत विकास निधी-१९ (RIDF-XIX) अंर्तगत राज्यातील ग्रामीण भागातील १५,००० व त्यापेक्षा अधिक लोकसंख्या असलेल्या २८ गावांत सांडपाणी प्रकल्प राबविण्यासाठी सन २०१६-१७ या वर्षाकरिता (लेखाशीर्ष २२१५ ९८७१ अंतर्गत) रु. २८००.०० लक्ष (रु.अठ्ठावीस कोटी फक्त) इतका निधी सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना पुढील तसेच वाचा मधील क्र.२ येथील पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचा शासन निर्णयात व वाचा मधील क्र.३येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयात नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे.

२. सदर योजनेसाठी निधी आहरीत करण्यासाठी (श्री.सुधाकर डांगे) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व (श्री.रूचेश जयवंशी) उप सचिव तथा प्रकल्प संचालक,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथे सादर करण्यात यावे. सदर योजनेसाठी रू.२८००.०० लक्ष इतका निधी कोषागारातून आहरीत करण्यासाठी संचालक (वित्त) (श्री.सुधाकर डांगे), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे तसेच (श्री. रूचेश जयवंशी), उप सचिव तथा प्रकल्प संचालक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर सहायक अनुदान हे सशर्त मंजूर करण्यात येत आहे.

३. या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेली रक्कम पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.

१) या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच कारणासाठी खर्च करण्यात यावे. संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी या शासन निर्णयान्वये मुक्त केलेला निधी, या कार्यक्रमासाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करावा. संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

२) सदर प्रकल्पातील समाविष्ट गावांसाठी आवश्यक ते सर्व तपशिलवार प्रकल्प अहवाल व आराखडे तयार करुन त्यांची यथायोग्य मंजूरी घेवून, अंमलबजावणी संदर्भात शासनाच्या प्रचलित नियमांनुसार आवश्यक ती कार्यवाही करण्याची दक्षता सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी घ्यावी.

३) क्षेत्रीय स्तरावरील तसेच कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसंबधी सर्व जबाबदारी सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांची राहील.

४) सदर प्रकल्पांतर्गत उपलब्ध निधी हा केवळ मंजूर असलेल्या २८ गावांत सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्पासाठी तसेच मंजूर असलेल्या तंत्रज्ञानाद्वारे राबविण्याकरिता खर्च करता येईल.

५) या प्रकल्पाबाबतचा भौतिक व आर्थिक मासिक प्रगती अहवाल महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने दर तीन महिन्यांनी शासनास सादर करावा.

६) वाचा मधील क्र.३ येथील वित्त विभागाकडील शासन निर्णयात नमूद केलेल्या अटींचे पालन करण्याबाबतची दक्षता महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी घ्यावी.

७) सदर प्रकल्पासाठीचे प्रतिपूर्ती दावे वेळोवेळी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी नाबार्डकडे सादर करुन त्याबाबत शासनास अवगत करावे.

८) शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित कालावधीत या विभागातील पापु-०४, पापु-१६ व पापु-२० या कार्यासनांस सादर करावा.

९) सदर रक्कम खर्च करताना वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/ प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२० एप्रिल, २०१६ मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करून आवश्यक त्या बाबींची पुर्तता करून कार्यपूर्ती अहवाल/नमूद प्रमाणपत्रे शासनास त्वरित सादर करावीत.

१०) सदर रक्कम खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरित सादर करावे.

४. हा खर्च मागणी क्र. वाय-०२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२ जलनिस्सारण व स्वच्छता, १०७ मलप्रणाल सेवा (०२), ग्रामसफाई कार्यक्रमांतर्गत अर्थसहाय्य (राज्य पुरस्कृत योजना) (०२) (११) ग्रामीण भागातील सांडपाणी व्यवस्थापनाकरिता नाबार्ड कर्ज (योजनांतर्गत) (२२१५ ९८७१) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली घालावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२० एप्रिल, २०१६ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तींच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ मधील तपासणीसुचीतील अ.क्र.१ ते १० मधील लागू असलेल्या अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१५२२४६९१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, cn=Vasant Bhimrao Mane
Date: 2017.03.30 18:07:58 +05'30'

**(व. भि. माने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक लेखा व कोषागरे, मुंबई.
५. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

७. उप सचिव तथा प्रकल्प संचालक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. विभागीय आयुक्त, महसूल विभाग, सर्व.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा, सर्व.
१०. संचालक, वासो, बेलापुर, नवी मुंबई.
११. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई.
१२. प्रबंधक, नाबार्ड, पुणे.
१३. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. कार्यासन क्र.पापु-०४, पापु-०८ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती, कार्यासन पापु-१६.